अरूणावती प्रकल्प,ता.दिग्रस,जि.यवतमाळ
प्रकल्पाच्या डावा मुख्य कालवा वितरण प्रणालीचे
कि.मी.० ते ४४ मधील विशेष दुरूस्तीचे कामाच्या
अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/ (प्र.क्र.१९५/२०२३)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: ११ ऑगस्ट २०२३

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपुर यांचे पत्र.जा.क्र २१३६/अरूणावती वि. प्र. वि. दु. / कातां ३ (१) / (धा २६/२०२३) / वि पा वि मं / २०२३ दि. २३/३/२०२३.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे) दि १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे), दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना:-**

अरूणावती प्रकल्प हा मोठा पाटबंधारे प्रकल्प यवतमाळ जिल्हयातील दिग्रस तालुक्यातील सावंगा (बु.) येथे अरूणावती नदीवर बांधण्यात आला आहे. प्रकल्पाचे कामास मे १९८० साली सुरूवात होवून जून १९९४ साली घळभरणीचे (Gorge Filling) काम पूर्ण करण्यात आले.सन १९९५ पासून वितरण प्रणाली पूर्ण झालेल्या भागात सिंचन सुरू आहे. प्रकल्पाची सिंचनक्षमता निर्मिती जून २००८ अखेर पूर्ण झाली आहे. प्रकल्पाची निर्मित सिंचनक्षमता २४००३ हेक्टर व संकल्पित उपलब्ध पाणीसाठा १६९.६९ द.ल.घ.मी. आहे.

अरूणावती प्रकल्पाच्या डावा मुख्य कालवा अस्तरीकरण विरहित असून कालव्यात मोठया प्रमाणात झाडे झुडपे वाढलेली असून गाळ साचला आहे व कालव्याचे भराव दबलेले आहेत. तसेच नलिका मोरी व जलसेतू येथुन मोठया प्रमाणात पाणी नाश होत आहे. याचा एकत्रित परिणाम होवून कालव्याचे शेवटचे भागात सिंचन कमी होत असून शेवटचे टोकापर्यंत संकल्पित विसर्गाने पाणी जात नसल्याने लाभधारकांच्या रोषाचा सामना करावा लागत आहे.विविध ठिकाणी कालव्याचा भराव खचल्याने पाणी गळती होत असून त्यामूळे लगतच्या शेत जमीनीस धोका निर्माण झाला असून कालव्याच्या भरावा मधुन व विविध बांधकामातून पाझर/गळती झाल्यामुळे शेत जमीनीचे नुकसान होत आहे.

या अनुषंगाने अरूणावती प्रकल्पाच्या ० ते ४४ कि.मी. मधील डावा मुख्य कालवा वितरण प्रणालीचे दुरूस्तीचे कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपुर अंतर्गत अरूणावती प्रकल्प,ता.दिग्रस,जि.यवतमाळ या प्रकल्पाच्या डावा मुख्य कालवा वितरण प्रणालीचे ० ते ४४ कि.मी. मधील दुरूस्तीच्या कामाचे अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत रू ४,८७,२३,४७५ **(**रू**.** चार कोटी सत्याऐंशी लक्ष तेवीस हजार चारशे पंचाहत्तर फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे**.**

१) तांत्रिक मान्यता,निविदा प्रक्रिया, कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ.बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय/परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.
२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.
३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन,निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.
४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय अधिका-याची राहील.
५) प्रकल्पाच्या डावा कालवा वितरण प्रणालीचे कि.मी. ० ते ४४ मधील ७०६.०४ हेक्टर सिंचनक्षेत्र पुनर्स्थापित करण्याची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय कार्यकारी अभियंता यांची राहील.
६) कालव्यातील गाळ व झाडेझुडपे काढण्यासाठी यांत्रिकी विभागाकडील मशिनरीचा उपयोग करावा.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०० मोठे पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती/विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (०४)(०३) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४७०० ०२४७) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. १५ सन २०२३-२४ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावरwww.maharashtra.gov.inउपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२३०८१११४२३०९९५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2023.08.11 14:33:12 +05'30'

**( न. गौ. बसेर )**

**शासनाच्या उपसचिव**

**सोबत सहपत्र :-**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
१७) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग , अमरावती
१८) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१९) अधीक्षक अभियंता , यवतमाळ सिंचन मंडळ, यवतमाळ
२०) कार्यकारी अभियंता, अरूणावती पाटबंधारे विभाग , दिग्रस
२१) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२३/(प्र.क्र.१९५/२०२३)/सिंव्य (कामे),

दि. ११/०८/२०२३ चे सहपत्र

| Sr.No. | Description of Item | Amount in (Rs.) |
|---|---|---|
| 1 | C - Works (Excluding Royalty) | |
| 2 | A) Subestimate No 1 | 7980640 |
| 3 | B) Subestimate No 2 | 5096040 |
| 4 | C) Subestimate No 3 | 22791800 |
| 5 | Total Work Cost = A+B+C = | 35868480 |
| 6 | Royalty | 4963930 |
| 7 | 1 % Insurance | 358685 |
| 8 | 18 % GST | 6456326 |
| 9 | 3 % Contingencies | 1076054 |
| | **Total Rs.** | 4,87,23,475 |

NAMITA
GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2023.08.11 14:33:40 +05'30'

( न.गौ.बसेर )
शासनाच्या उपसचिव